**राज्य ई-गव्हर्नन्स कार्यक्रमांतर्गत सन २०२०-२१ या वित्तीय वर्षामध्ये साऊ-सेवार्थ (SAU-SEVARTH) प्रणालीसाठी मनुष्यबळ खर्च भागविणे करिता रु.५४.३० लाख निधी वितरीत करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय व मत्स्यव्यवसाय विभाग,**
**शासन निर्णय क्र. संकीर्ण -०६२०/प्र.क्र.७५/१४-अे,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय मुंबई-४०० ०३२
दिनांक - १७ जूलै, २०२०

संदर्भ :-१) वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२०/प्र.क्र.६४/अर्थ-३, दि. १६/०४/२०२०.
२) महाराष्ट्र माहिती तंत्रज्ञान महामंडळ (MahaIT) यांचे पत्र
क्र. MahaIT/PRJ/168/01/2020, दि. 05/03/2020

प्रस्तावना :-

कृषि व पदुम विभागाचे (खुद्द), मंत्रालय तसेच कृषि आयुक्तालय व अखत्यारितील कार्यालयांचे संगणकीयदृष्ट्या बळकटीकरण व्हावे यासाठी राज्य ई-गव्हर्नन्स कार्यक्रम ही योजना राबविण्यात येते. सदर योजनेंतर्गत सन २०१९-२० या वित्तीय वर्षामध्ये एकूण रुपये ३५०० लाख अर्थसंकल्पित केलेले आहेत.

कृषि विभाग व कृषि विभागाच्या अधिपत्याखाली असलेल्या वसंतराव नाईक मराठवाडा कृषि विद्यापीठ, परभणी, डॉ. पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठ, अकोला, महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी, डॉ. बाळासाहेब सावंत कोकण कृषि विद्यापीठ, दापोली, महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद, पुणे व वसंतराव नाईक राज्य कृषि विस्तार व्यवस्थापक प्रशिक्षण संस्था (वनामती), नागपूर व इतर संलग्न कार्यालयासाठी तयार करण्यात आलेल्या साऊ सेवार्थ प्रणालीच्या देखभालीसाठी आवश्यक मनुष्यबळाचे दि.०१.०४.२०२० ते दि.३१.०३.२०२१ या वर्षाचे परिश्रमिक (मानधन) रु.५४,३०,२०१ /- चे देयक MahaIT कडून कृषि विभागास संदर्भाधिन पत्राव्दारे प्राप्त झालेले आहे. राज्य ई-गव्हर्नन्स कार्यक्रमांतर्गत मंजूर निधीमधून MahaIT यांना रु. ५४,३०,२०१/- अदा करण्यास मान्यता देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता, त्यानुषंगाने शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय :-**

१. सन २०२०-२१ या वित्तीय वर्षामध्ये ई-गव्हर्नन्स योजनेंतर्गत मंजूर निधीमधून कृषि विभाग व कृषि विभागाच्या अधिनस्त कार्यालयांसाठी तयार करण्यात आलेल्या “साऊसेवार्थ प्रणालीच्या” देखभाल व विकसनासाठी आवश्यक मनुष्यबळाचे दि.०१.०४.२०२० ते दि.३१.०३.२०२१ या वर्षाचे परिश्रमिक (मानधन) रु.५४,३०,२०१/- (रुपये चोपन्न लाख तीस हजार दोनशे एक फक्त) महाराष्ट्र माहिती तंत्रज्ञान महामंडळास (Maha IT) अदा करण्यास मंजूरी देण्यात येत आहे.

२. या शासन निर्णयान्वये कृषि विभागांतर्गत ई-गव्हर्नन्स कार्यक्रमाकरिता रु. ५४,३०,२०१/- (रुपये चोपन्न लाख तीस हजार दोनशे एक फक्त) निधी वितरीत करण्यात आला असून तो पुढील लेखाशिर्षांतर्गत सन २०२०-२१ करिता अर्थसंकल्पीत करण्यात आलेल्या तरतुदीतुन खर्ची टाकावा :-

**“मागणी क्र.डी-७**
**३४५१ सचिवालय- आर्थिक सेवा,**
**पंचवार्षिक योजनांतर्गत योजना**
**(०२) योजना**
**(०२) (०४) ई-गव्हर्नन्स कार्यक्रम अंमलबजावणी**
**(कृषि) (३४५१ २७८२),१७ संगणक खर्च**

**३.** या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आलेला रु. ५४,३०,२०१/- निधी कोषागारातून आहरण व वितरणासाठी अवर सचिव (आस्थापना), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून व उप सचिव (आस्था), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

**४.** हा शासन निर्णय वित्त विभागाचे परिपत्रक क्र. अर्थसं-२०२०/प्र.क्र.६५/अर्थ-३, दि.०४/०५/२०२० नुसार विहीत केलेल्या अटींची पुर्तता होत असल्याने निर्गमित करण्यात येत आहे.

**५.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००७१७१३४२२४७४०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यापाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Shrikant Chandrakant Andge

Digitally signed by Shrikant Chandrakant Andge
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture and ADF Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=5d5ab93b4e4f2fcd87e12fe19b8965025d482b1bee0fffaa62085c34db6bfd8c, serialNumber=d8d9626c9e038380cd235c048f20d7ce74cffd3a95f2ac3c192e9c991f358271, cn=Shrikant Chandrakant Andge
Date: 2020.07.17 13:39:11 +05'30'

**(श्रीकांत आंडगे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) आयुक्त (कृषि), महाराष्ट्र राज्य, पुणे
२) अवर सचिव (आस्थापना), कृषि व पदुम विभाग (खुद्द) मंत्रालय, मुंबई-३२

**प्रत-**

१) मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य
२) मा.मंत्री (कृषि व फलोत्पादन), मंत्रालय, मुंबई
३) मा. विरोधी पक्षनेता विधानसभा/ विधान परिषद, विधान भवन, मुंबई
४) मा. राज्यमंत्री (कृषि), मंत्रालय, मुंबई
५) सर्व मा. संसद सदस्य/महाराष्ट्र विधानसभा सदस्य/महाराष्ट्र विधानपरिषद सदस्य
६) मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य
७) अपर मुख्य सचिव (वित्त), मंत्रालय, मुंबई
८) अपर मुख्य सचिव (कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
९) महालेखापाल१/२ (लेखा परिक्षा) मुंबई/नागपूर
१०) वरिष्ठ जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
११) संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई/अधिदान व लेखा कार्यालय मुंबई
१२) सहसंचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष नवीन प्रशासकीय भवन ५ वा मजला, मुंबई
१३) निवडनस्ती (१४-अे कार्यासन) कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२